विधानमंडळातील मुख्य प्रतोद / प्रतोद यांना सुविधा देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**संसदीय कार्य विभाग,**
**शासन निर्णय, क्रमांक : संकीर्ण-२०१६/२१२/प्र.क्र.७५/दोन,**
**मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई- ४०० ०३२.**
**दिनांक :- ११ ऑक्टोबर, २०१८.**

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र विधानमंडळ सदस्य (निरर्हता दूर करणे) अधिनियम, १९५६ यामध्ये करण्यात आलेल्या सुधारणांच्या पार्श्वभूमीवर महाराष्ट्र विधानमंडळातील मुख्य प्रतोद / प्रतोद यांना काही सुविधा अनुज्ञेय करणे आवश्यक असल्याने विधानमंडळातील एकूण सदस्य संख्येच्या १० टक्के सदस्य असणाऱ्या ४ पक्षांच्या दोन्ही सभागृहातील मिळून एकूण चार मुख्य प्रतोद आणि पाच प्रतोद यांना त्यांच्या पदाची कार्ये अधिक परिणामकारकपणे पार पाडता यावीत, यासाठी काही सुविधा विधानमंडळ सचिवालयामार्फत उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

वरील प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेऊन शासनाने असा निर्णय घेतला आहे की, विधानमंडळातील मुख्य प्रतोद / प्रतोद यांना विधानमंडळ सचिवालयामार्फत खालील प्रमाणे सुविधा पुरविण्यात याव्यात.

१. टोकन मानधन :- मुख्य प्रतोद- रु.२५,०००/-, प्रतोद- रु.२०,०००/- प्रतिमहा. याप्रमाणे मुख्य प्रतोद व प्रतोद यांचे मानधन १२ महिन्यांसाठी परिगणित करण्यात यावे व ते दिनांक ११ डिसेंबर, २०१७ पासून अदा करण्यात यावे.
२. विधानमंडळाच्या मुंबई येथील अधिवेशनकालावधीत "मुख्य प्रतोद" यांना रु.२५,०००/- व "प्रतोद" यांना रु. २०,०००/- इतका ठोक वाहन भत्ता अनुज्ञेय राहील. नागपूर येथील अधिवेशनासाठी विधानमंडळ सचिवालयाने विभागीय आयुक्त, नागपूर यांचे कार्यालयाकडून वाहन व्यवस्था उपलब्ध करुन देण्याची कार्यवाही करावी.
३. एक स्वीय सहायक, एक लिपिक-टंकलेखक व एक शिपाई.
४. विधानमंडळ सचिवालयात स्वतंत्र कार्यालय.
५. विधानमंडळ सचिवालयातील कार्यालयात दूरध्वनी सुविधा.
६. विधानमंडळाच्या विधानसभा या सभागृहात सत्तारुढ पक्षाचा एक व घटक पक्षाचा एक "मुख्य प्रतोद" असेल. त्यानंतर एकूण सदस्य संख्येच्या १० टक्के सदस्य संख्या असणाऱ्या पक्षांचे प्रत्येकी एक सदस्य "प्रतोद" असतील. म्हणजेच सध्याच्या विधानसभेत भारतीय जनता पक्षाचा एक व शिवसेनेचा एक सदस्य हे "मुख्य प्रतोद" असतील. तसेच भारतीय जनता पक्ष, काँग्रेस पक्ष व राष्ट्रवादी काँग्रेस पक्ष या पक्षांचा प्रत्येकी एक सदस्य "प्रतोद" असेल.
७. विधानमंडळाच्या विधान परिषद सभागृहात सत्तारुढ पक्षाचा एक व घटक पक्षाचा एक "मुख्य प्रतोद" असेल. त्यानंतर एकूण सदस्य संख्येच्या १० टक्के सदस्य संख्या असणाऱ्या पक्षांचे प्रत्येकी एक सदस्य "प्रतोद" असतील. म्हणजेच विधान परिषदेत सध्या भारतीय जनता पक्षाचा एक व शिवसेनेचा एक सदस्य हे "मुख्य प्रतोद" असतील. तसेच काँग्रेस पक्ष व राष्ट्रवादी काँग्रेस पक्ष या पक्षांचा प्रत्येकी एक सदस्य "प्रतोद" असेल.

८. अशा प्रकारे विधानमंडळात चार "मुख्य प्रतोद" व पाच "प्रतोद" असतील. "मुख्य प्रतोद" यांना फक्त राजशिष्टाराचारापुरता मंत्रीपदाचा दर्जा राहील. मात्र मंत्री पदाला अनुज्ञेय असणारे वेतन, भत्ते व अन्य कोणत्याही सुविधा त्यांना अनुज्ञेय राहणार नाहीत.

९. "प्रतोद" यांना फक्त राजशिष्टाराचारापुरता राज्यमंत्रीपदाचा दर्जा राहील. मात्र राज्यमंत्री पदाला अनुज्ञेय असणारे वेतन, भत्ते व अन्य कोणत्याही सुविधा त्यांना अनुज्ञेय राहणार नाहीत.

**२.** मुख्य प्रतोद आणि प्रतोद यांच्या कामकाजाची कार्यकक्षा मुख्यत: विधानमंडळ सभागृहातील कामकाजाशी निगडीत आहे आणि केवळ अधिवेशन कालावधीपुरतीच मर्यादीत असल्यामुळे त्यांना द्यावयाच्या सर्व सुविधा या विधानमंडळ सचिवालयामार्फत पुरविण्यात येतील. त्यामुळे या सर्व सुविधांवर होणारा खर्च हा महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयाच्या मंजूर अर्थसंकल्पिय तरतूदीतून भागविण्यात येईल.

**३.** यासाठी विधानमंडळ सदस्यांच्या भत्ते नियमांच्या धर्तीवर महाराष्ट्र विधानमंडळ मुख्य प्रतोद / प्रतोद भत्ते नियम विधानमंडळ सचिवालयामार्फत आवश्यकतेनुसार तयार करुन घेण्यात यावेत.

**४.** प्रस्तुत शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक - ७६/२०१८/ व्यय-४, दिनांक २६ सप्टेंबर, २०१८ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**५.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन दिलेला असून त्याचा संगणक संकेतांक २०१८१०१११४५१०७५०१५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Rajendra Gajanan Bhagwat

Digitally signed by Rajendra Gajanan Bhagwat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law and Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cc7aabd81415b8f5527e47fcdf6cb267b325f7490f2a874918347994ab7f727a, serialNumber=d818186dee70df53c608510c8f5de9e22be5a193d4a6472ca4de45a568dc44a7, cn=Rajendra Gajanan Bhagwat
Date: 2018.10.11 14:53:48 +05'30'

**(राजेन्द्र ग.भागवत)**
**सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति :-**

१) महालेखापाल - १ (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र , मुंबई.
२) महालेखापाल - २ (लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र , नागपूर.
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४) निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई.
५) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
६) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
७) प्रधान सचिव, वित्त विभाग (व्यय -४), मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
* ८) प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई- ४०० ०३२. (स्वतंत्र पत्राने)
( त्यांना विनंती आहे की, शासन निर्णयात नमूद सुविधा मा. मुख्य प्रतोद व प्रतोद यांच्या निदर्शनास कृपया आणून द्याव्यात.)

९) सचिव, संसदीय कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१०) मा. मंत्री, वित्त यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
११) मा. मंत्री, संसदीय कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१२) मा. मंत्री, उद्योग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१३) मा. विरोधी पक्ष नेता यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधान परिषद / महाराष्ट्र विधानसभा,विधानभवन,मुंबई
१४) मा. राज्यमंत्री, जलसंपदा, जलसंधारण, संसदीय कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१५) मा. राज्यमंत्री, गृह (शहरे), नगरविकास, सामान्य प्रशासन, विधि व न्याय, संसदीय कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१६) निवडनस्ती